**काळया-पिवळया टॅक्सींमध्ये प्रवाशांच्या मागणीनुसार वातानुकुलित यंत्रणा सुरु करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - एमव्हीआर ०३१७/ प्र.क्र.१६३/ परि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई.
दिनांक - ११ एप्रिल, २०१७.

**प्रस्तावना** -

राज्यातील महानगरांमध्ये बिगरवातानुकुलित काळी-पिवळी टॅक्सी आणि वातानुकुलित कुलकॅब टॅक्सी कार्यरत आहेत. सध्या राज्यात व मुंबई महानगर क्षेत्रात मोटार वाहन उत्पादकांकडून वातानुकुलित वाहनांचे उत्पादन मोठया प्रमाणात होत असल्याने बहुतांशी काळी-पिवळी टॅक्सींना वातानुकुलित यंत्रणा बसविलेली असताना ती बंद असते. त्यामुळे ज्या काळी-पिवळी टॅक्सींमध्ये वातानुकुलित यंत्रणा आहे आणि प्रवाशाने मागणी केल्यास काही अधिकचे प्रवासभाडे आकारुन वातानुकुलित यंत्रणा सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

काळी-पिवळी टॅक्सीमध्ये वातानुकुलित यंत्रणा चालू स्थितीतील असेल तर आणि प्रवाशाने मागणी केल्यास (On Passenger Demand) काळी-पिवळी टॅक्सीसाठी असलेल्या मीटरनुसार नियमित भाडेदरापेक्षा २०% जादा भाडे आकारुन वातानुकुलित काळी-पिवळी टॅक्सी चालविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. ज्या काळी-पिवळी टॅक्सींना वातानुकुलित यंत्रणा उपलब्ध असेल अशा वाहनाच्या समोरच्या काचेवर (विंड स्क्रिन) लाल अक्षरात "A/C" असा लोगो लिहिण्यात/चिकटवण्यात यावा.

३. काळी-पिवळी टॅक्सी वातानुकुलित यंत्रणेसह चालविण्यासंदर्भात राज्य परिवहन प्राधिकरण तसेच इतर क्षेत्रीय परिवहन प्राधिकरणे यांनी सदर शासन निर्णयाचे अंमलबजावणीबाबत तात्काळ ठराव पारित करुन पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०४१११७४०३२७१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ghiratkar Nitin Jyotinath

Digitally signed by Ghiratkar Nitin Jyotinath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, cn=Ghiratkar Nitin Jyotinath
Date: 2017.04.11 18:12:59 +05'30'

**(नि.ज्यो.घिरटकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व मा.मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) अध्यक्ष, परिवहन प्राधिकरण (सर्व)
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व पोलीस आयुक्त
९) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
१०) सदस्य, परिवहन प्राधिकरण (सर्व)
११) सदस्य सचिव, परिवहन प्राधिकरण (सर्व)
१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (दोन प्रती प्रसिध्दी करीता)
१३) प्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व)
१४) निवड नस्ती (परि-२)